

# उंबरखिंडीतील घटना चक्र

## करतलबखानाचा उतरला नक्षा -
## अंबे नळीतील शरणागती - भाग 1.

**भीषण कुरवंडे घाटातून कसेबसे मुगल सैन्य उतरले**






# अरुंद डोंगराळ भागात दयनीय परिस्थिती




या छोट्या आणि अरुंद जागेत 20 हजार सैनिक, 10 हजार जनावरे, दारूगोळा, चारा, तंबू, धान्य अडकले होते. अदृश्य शत्रूचा सामना करणे अशक्य होते.

# उंबर खिंडीतील समरभूमी स्मारक





# 'अशा संशोधनांच्या मर्यादा'

- सादरीकरण शोध स्वातंत्र्यावर आधारित आहे. आजच्या लष्करी कमांडर्सना त्या काळातील मर्यादा लक्षात घेऊन लष्करी दृष्टिकोनातून अशा मोहिमा आखण्याच्या आणि पार पाडण्याच्या सूचना मिळाल्या, तर ते त्याची अंमलबजावणी कशी करतील? असे गृहीत धरले आहे.
- भारतीय इतिहासात, ऐतिहासिक लढायांचे विशिष्ट तपशील विश्वसनीय पुराव्याअभावी उपलब्ध नाहीत. त्यामुळे त्या लढाईत सहभागी झालेल्या व्यक्तींचे वर्तन, शौर्य, साहस, लष्करी व्यवस्थापन कौशल्ये, उपलब्ध साधनसामग्री, शस्त्रास्त्रे लक्षात घेऊन या मोहिमा सादर केल्या जात आहेत.
- वर्णन केल्याप्रमाणे घटना प्रत्यक्षात घडल्याचा दावा नाही. मोहिमा कशा झाल्या असतील याची शक्यता दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

# रणांगणातील शिवाजी महाराजांच्या थोर सेनापतीचे गुण



- शरण आलेल्या अफाट सैन्याला शिवाजी महाराजांनी आदरपूर्वक वागणूक दिली.
- मागे राहिलेल्या प्रचंड युद्धसाहित्याचे त्याने कसे विचारीपणाने वाटप केले आणि त्याची विल्हेवाट लावली.
- या मोहिमेतून शिवाजी महाराजांचे व्यापक मनाचे व्यक्तिमत्त्व दिसून येते.



# शाहिस्तेखानाने नेमले करतलबखानाला

- जानेवारी १६६१ मध्ये एक मोठी मोहीम कोकणातील मराठी प्रदेशावर करण्याचा आराखडा आखला.
- या मोहिमेचे सेनापतिपद त्याने करतलबखान या उझबेक सरदाराकडे सोपविले. हा खान घमेंडखोर होता. याच्याबरोबर अनेक सरदार नेमण्यात आले. त्यात सावित्रीबाई देशमुख उर्फ पंडिता रायबाघन ही हुशार, वऱ्हाडी सरदारीणही होती.
- खानाच्या फौजेचा नक्की आकडा उपलब्ध नाही. पण तो पंधरा हजारापेक्षा कमी नक्कीच नव्हता. अन्य साधनांचा विचार करता तो वीस हजार असावा असे धरून पुढील व्युह रचला आहे.
- शाहिस्तेखानाने या करतलबला पेण, पनवेल, नागोठणे हा भाग जिंकावयाचा हुकूम केला. पण करतलब असा अतिउत्साही म्हणजेच घमेंडखोर होता की, त्याने म्हटले की, ‘हुजूर, नागोठणे, पेण, पाली, पनवेल तर मी काबीज करतोच, पण कोकणातील शिवाजींचे कल्याण भिवंडीपासून ते दक्षिणेकडे (महाडकडे) असलेली सारी ठाणी आणि मुलूख कब्जा करतो.

# हा करतलब खान कोण?



- असा प्रश्न कै. बाबासाहेब पुरंदऱ्यांना विचारला असता तर ते म्हणाले असते...
- "करतलब" हा रुतबा (पदवी ) त्यांच्या वडिलांना जहांगिराच्या पदरी शौर्य केले म्हणून मिळाली.
- सत्तास्पर्धेत औरंगजेबाच्या बाजूने त्याने दाराशुकोहच्या तर्फे लढणाऱ्या जोधपुरच्या जसवंत सिंहाचा पराभव केला होता म्हणून बापाची करतलब पदवी त्याला देऊन त्याची शाहिस्तेखानाचा विश्वासू सरदार म्हणून नेमणूक झाली होती.
- त्याने नुकतेच परिंड्याच्या किल्ला सर करायच्या मोहिमेचे यशस्वी नेतृत्व केले होते. त्याचा मान राखून त्याला कोकणातील महत्वाचे किल्ले जिंकायची मोहीम दिली गेली होती.
- कल्याणचा गेलेला ताबा मिळवून त्यासोबत व्यापारातून मिळणारे उत्पन्न जमा करायची व्यवस्था करणे गरजेचे होते.

# १. या मोहिमेसाठी कारतलबखानची निवड का करण्यात आली?



- ❖ लेफ्टनंट जनरल विनोद खंदारे यांना विचाराल तर ते म्हणतील.
- ❖ शाइस्ताखानला उझबेग सरदार आपल्या जवळचे वाटत होते.
- ❖ त्याने नुकताच परांडा किल्ला जिंकण्याचा पराक्रम केला होता.
- ❖ जरी त्याला डोंगराळ मार्गाची सवय नव्हती, दमट समुद्राच्या हवेच्या संपर्कात तो नव्हता.
- ❖ पण तरीही तो अडचणींवर मात करून विजयी होईल असा विश्वास होता.
- ❖ तो इतर सरदारांपेक्षा वरिष्ठ होता. काहीतरी करण्याची जिद्द त्याच्यात होती.

# २.कुरवंडे घाटातून उतरायचे करतलब खानाने का ठरवले?






- मे. जनरल शिशिर महाजन म्हणतील,
- 'बोर घाटातून खाली उतरून पुन्हा परत पालीकडे यायचा मुख्य पर्याय त्याने सुरवातीला निवडला. पण लोणावळ्या पर्यंतचा मार्ग अनुभवल्यावर त्याची हिम्मत वाढली.
- माहितगार वाटाड्यांनी कुरवंडे घाटातून अंबा नदीच्या पात्राला धरून थेट पालीच्या चौकीवर आपले ठाणे वसवले की नंतर सुधागडावर मुख्य केंद्र करून भिवंडी-कल्याणचे एकाकी पडलेले किल्ले पावसाळ्याच्या आत सहज मिळवून ही मोहीम फत्ते करता येईल.
- म्हणून धक्का तंत्राने सिवाला चकवता येईल' असा विचार केला.



# ३. शाहिस्तेखानाने काय कामगिरी सोपवली होती?

- शायिस्तेखानाला दक्षिणेतील सुभेदारीत जास्त तकतक न करता मजेत घालवायची होती.
- आदिलशाह इराणी होता. त्याचे सिवाशी पटत नव्हते. म्हणून सिवाला विजापुरकराशी लढवत ठेवायला हवा.
- मुगली राजवटील लागणारा पैसा समुद्रावरील व्यापारातून मिळवला की औरंगजेब जास्त कटकट करणार नाही. त्यासाठी जुन्या अहमदनगर शाहीतील कल्याण व भिवंडी किल्ले कसेही करून मिळवायचे.
- पावसाळा सुरू व्हायच्या आत त्याला कोकण पट्टी काबीज करून हवी होती.
- करतलबखानावर ती कामगिरी सोपवून आपले काम नक्की होईल असा भरवसा त्याला होता.
- मुलगी परीचा निकाह दिल्लीतील वजीरे आजम च्या शाहजाद्याशी थाटात लावून द्यायचा त्याचा बेत होता. इति एयर मार्शल भूषण गोखलेंचे विचार.



# ४. मोहिमेत एकूण सैन्य किती असावे?

- अनेक इतिहासकारांनी संशोधन करून विविध आकडे सादर केले आहेत.
- त्या सर्वांचा विचार करता २० हजार ही कमीतकमी संख्या असावी असे मानले आहे. शिवाजी महाराजांकडून २ हजार उभे व १ हजार राखीव सैन्य असावे.
- कारण घाटातून खाली उतरल्यावर अंबा नदीचे पात्र आणि दोन्ही बाजूकडील डोंगरांच्या मधील भागात वाहतुकीची, लढायची जनावरे, बाजारबुणगे धरून २० हजार सैन्य कसेबसे त्यातून पार जातील अशी नैसर्गिक परिस्थिती आहे.
- मात्र यावर वेगळा विचार केला जावा. इति विंग कमांडर शशिकांत ओक.

# ५. जर शिवाजी महाराजांशी त्याची गाठ पडली नसती तर त्यांचा मुख्य तळ त्याने कुठे केला असता?



- ❖चावणी पासून अंबा नदीचे पात्र पकडून तो पाली गावापाशी आला असता. तिथे अनेक वाहतुकीचे मार्ग एकत्र येत होते. चौल बंदरातील माल जकातनाके, भिवंडी-कल्याण किल्ल्याकडे जाणारी पुर्वापारची भक्कम चौकी होती.
- ❖सरसगडावर सैनिकांच्या राहायची सोय झाली असती. तिथून वाहतुकीवर जरब ठेवून जकात वसूल करता येणे शक्य होते. सैन्याच्या हालचालींवर नियंत्रण करायला शक्य होते.
- ❖सिवाला कल्याण–भिवंडीला याच रस्त्याने जायला लागेल तेंव्हा त्याचा बंदोबस्त करायला शक्य होते.
- ❖जवळच सुधागड नावाचा अत्यंत अवघड किल्ला मुख्यालय म्हणून हाती घेतला तर सिवाला पायथ्याशीच लढवून मारता येणे शक्य होईल वगैरे शक्यता विचारात घेता सरस गडाकडे व नंतर सुधा गडाकडे तो निघाला होता... इति एयर मार्शल सुनीत सोमण.

# पाली ठाण्याचे महत्व


भिवंडी किल्ला
कल्याण किल्ला
चौल बंदर
पाली नाका
Vasai Virar
Bhiwandi
Borivali
Thane
Kalyan
Junnar
Choul, Alibag, Maharashtra
Panvel
Manchar
Karjat
Rajgurunagar
Khopoli
Chakan
Pimpri
Pali
Pune


सुधागड
कल्याण रस्ता वसूली ठाणे
चौल बंदरमार्ग वसूली नाके
पाली - सुधागड ठाणे
अहमद नगरच्या निजामशाहीकडील ही ठाणी मुगलांची दुभती गाय होती. ती शिवाजी महाराजांकडून परत मिळवणे हा जीवन मरणाचा प्रश्न होता.
MAIN TOWN
WIDSAI
Khopoli Pali Road
CHIVE
KONDGAON
PIGONDE
CHIKHALGAON
RASAL
NADSUR
KADSURE
NH66
GHERA
GAD
Pali
PUI
Sudhagad
NEW TOWN
SH93
BHARJE
TAMSOLI
SH94
BHISE
KHAD SAMBALE
AINGHAR
APATWANE
NIDI TARF ASHTAMI
Roha
VITTHALWADI
DIGHEWADI
© 2022 TomTom

# मोहिमेतील सामील असलेले सरदार

- ❖ याचे उत्तर इतिहास व युद्ध अभ्यासक विद्याधर रायरीकर देताना म्हणतील,
- ❖ ‘त्याच्या बरोबर रजपूत घराण्यातील कच्छप, चौहान, अमरसिंग, मित्रसेन, तर मराठा दलाचे सरदार जाधवराव, जसवंत कोकाटे व रायबाघन ही स्त्री योद्धांत समावेत होती.
- ❖ त्यांच्यातील सामाविष्ट सरदारांचे सैनिकांचे पोषाख, भाषा, धर्म, भोजन, लढण्याच्या पद्धती वेगवेगळ्या होत्या. या भिन्नतातून त्यांच्यातील एकीचा, एकमेकांशी संपर्काचा अभाव असल्याने एकसूत्रीपणा नसायला वाव होता.
- ❖ या मोहिमेनंतर करतलबखानाचा नामोउल्लेख आढळत नाही. बहुधा युद्ध न करता झालेल्या त्या दारुण पराभवाच्या नामुष्कीने त्याला उत्तरेला परत पाठवले गेले असायची शक्यता आहे’.

# मिलिटरीतील सैन्य रचना

- ❖आजच्या काळात 20 हजारांचे सैन्य म्हणजे एक डिव्हिजन असते. त्याचे नेतृत्व  मेजर जनरल करतात.
- ❖रायबाघन  ही  एक हजार सैन्याचे पथक असलेली आजच्या लेफ्टनंट कर्नलच्या दर्जाची  असावी.
- ❖यापुढील लढ्याचे वर्णन सध्याच्या मिलिटरीच्या रचनेतील प्रमाणांचे मोजमाप लावून सादर केले आहे.
- ❖सामान्यतःमिलिटरीतील सैन्य रचना खालील प्रमाणे असते.
- ❖पदोन्नतीची  गरज व अन्य कारणांनी  भारतीय सेनेत रँक आणि सैन्याचे बळ, ओहोदे याचे नाते तसेच असेल असे नाही.

# लढ्यातील महत्वाच्या भागाकडे जाऊ या

- सध्याच्या (आर्मी) भूदलाच्या संरचनेचा आधार घेऊन यापुढे प्लाटून, कंपनी, ब्रिगेड असा निर्देश केला जात आहे.
- 9 शिपाई व त्यांवर नाईक असे 10 जणांचे लेफ्टनंटच्या हाताखालील एक पथक (स्क्वाड)
- 3 पथकांची कॅप्टनच्या हाताखालील एक तुकडी (प्लाटून) साधारण 30 ते 40 सैनिक.
- 3 ते 4 तुकड्यांची मेजरच्या हाताखालील एक कंपनी. साधारण 150 ते 200 सैनिक.
- 3 ते 5 कंपनींचे लेफ्टनंट कर्नलच्या हाताखालील एक बटॅलियन साधारण 600 ते 900 सैनिक..
- 3 किंवा जास्त बटॅलियन कर्नलच्या हाताखालील एक ब्रिगेड साधारण 3000 ते 5000 सैनिक.
- तेंव्हा नेताजी पालकर हे ब्रिगेडियर च्या हुद्द्याचे येसाजी कंक, तानाजी ले. कर्नल तर करतलबखान मेजर जनरल ह्या हुद्द्यावर होता असे सर्वसाधारण म्हणता येईल.

# सध्याची मिलिटरीची रचना



# करतलबखानाचा जायचा मार्ग




पुणे ते छा(चा)वणी नकाशा अंतर 73 किमी

# करतबखानाच्या जायच्या मार्गावरील सेवा सुविधांची गरज

- बरोबर मालवाहक ५००पेक्षा जास्त बैलांवर, हजारो गाढवे व घोड्यांच्या पाठीवर तंबू, खानपान सेवेची भाडीकुंडी, छप्परबंदांचे डेरे, शाही खजिन्यांचे अवजड पेटारे, बंदुका, छोट्या तोफा, दारू गोळा आदि प्रचंड शस्रसामुग्रीसह घोडदळ व पायदळ मिळून वीस हजारापेक्षा जास्त सैन्य व बरोबरचा लवाजमा आणि मदतनीस दिमतीला होते.
- १० हजार घोडे, मालवाहक ५०० बैल, ५०० गाढवे असे सैन्य संचलित होऊन जात होते. वाटेत थांबून भोजनाची व्यवस्था पाहायला आघाडीची पथके सैनिकांची राहायची जागा शोधणे, जनावरांना पाणी व वैरणीची सोय करणे, मोठ्या सरदारांचा तंबू व राहुट्यांतून भिस्तींनी पाण्याची सोय करण्यात गुंतलेले असत.
- त्यानंतरच्या पडावाच्या ठिकाणी आधीची पुढे गेलेली सैन्य पथके मागील पसारा आवरून पुढे जाऊन व्यवस्था करायला जात असत.

# करतबखानाचा पुण्याहून जायचा विस्तृत नकाशा मार्ग

❖ लाल महाल - (शनिवार वाडा) ते खडकी अंतर 7 किमी.

❖ खडकी, तळेगाव, वडगाव करत लोणावळ्याच्या आसपास महाराजांच्या हेरांना गोंधळात टाकायला बोरघाटातून उतरत आहे असे दर्शवले.

❖ कुरवंडा घाटातून पाली नागोठणेला पोहोचायला सोईचे असे वाटले.

❖ त्याने सल्लागारांच्या मदतीने अचानक ठरवून मार्ग बदलला.



# खडकी ते देहू पर्यंतचा मार्ग २० किमी

- नद्या, नाले, उंच-सखल टेकाडे, जनावरांना पाणी आणि वैरणीची सोय.
- सैन्याची राहायची, जेवायची ठिकाणे, बाबी विचारात घेऊन ठरवला गेलेला मार्ग …



# देहू ते मळवली पर्यंतचा मार्ग ३८ किमी

- वडगाव, खडकाळे, कामशेत अशा सखल भागातून पुढे सरकत असताना...
- वेग वेगळे सरदार आपल्या फौजेचा हाल हवाल, गिनती, तोफा, दारूगोळे यांवर विशेष लक्ष ठेऊन होते. या लढाईत विजय मिळवायला सोपा आहे.
- तो मिळवला की...



# मळवली ते लोणावळा १३ किमी मार्ग

- मळवली कडून सध्याच्या लोणावळ्याच्या आसपासून १३ कि मी जाणारा मार्ग नकाशा.
- रायबाघन यांनी आपले सैन्य नांदेड भागातून आणले होते. ते दमलेले होते.



- एक दिवस अगोदर.
- भीषण  उताराच्या रस्त्याने जाण्यासाठी सैन्य सखल भागात तयार होत होते.
- घाटाची पहाणी करून ठरवले गेले की खूप तीव्र उतार हाताळला जाऊ शकत नाही. फक्त छोटे तंबू, बंदुका, हलक्या तोफा बरोबर घेतल्या जातील. बाकी मोठ्या तोफा, शाही तंबू सोप्या उतारानं नंतर आणता




आदल्या दिवशीचा घाट उतरायच्या तयारीचा तळ

# करतलब खानाचा आदल्या रात्रीचा तळ

## (सध्याचा आय एन एस शिवाजी तळाच्यामागे)



# मनोरथात रमलेले उत्तरेतील सरदार

- ❖ अशा डोंगरात लपून लढाई करण्यात काही मजा नाही.
- ❖ या जीवघेण्या डोंगर रांगातून लपलेला सिवा हातात यायला हवा.
- ❖ तो उंदरासारखा चूहे का बच्चा. आमच्या समोर त्याची काय बिशाद?
- ❖ इथून ही कामगिरी फत्ते करून मग उत्तरेला आपल्या संस्थानात जाऊन पुढच्या हुद्द्यासाठी लग्गा लावायला सुरवात करावी लागेल.
- ❖ औरंगजेबानी आपल्या चैनी शायिस्ताखान मामाला इथे सुभेदार केले. तो बसतो आरामात पण आम्हाला पळवतो.
- ❖ करतलब खानाला आपल्याला ५ हजारी कसे बनता येईल याची फिकर पडली आहे. त्याचा जनाना बरोबर आहे. त्याला काय फरक पडतोय. मोहीम कितीही लांबली तरी...

# कुरवंडे घाटाची भीषणता

- ❖ आपली टेहेळणी पथके पाठवून त्या मार्गाने जायला काय गैरसोई व धोके आहेत याची माहिती करतलबखानान आधी घेतली.
- ❖ शिवा या भागात आलेला नाही असे त्याच्या हेरांकडून समजल्यावर त्याने १ फेब्रुवारी १६६१ रोजी कुरवंड्याच्या पठारावर रात्र काढून पहाटेची नमाज अदा केली. तंबू आणि खानपान सेवावाले आधी गेले. नंतर आपापली शस्त्रे व जनावरे बरोबर घेऊन एका डोंगराच्या टेपावरील पाय वाटेने खाली उतरायला सुरवात केली.
- ❖ अत्यंत तीव्र उतार असलेल्या, तीन किमी घाटातील एका बाजूला दरी व एका बाजूला उंच डोंगराचे सुळके यातून ते सैन्य बरोबर आणलेल्या बोजड पण गरजेच्या सामानासह बिकट वाट काढत खाल उतरत होते.

# कुरवंडा घाटातील जीवघेणी उतरती वाट



# मुगल सैन्याला हात वर करून शरणागत का व्हावे लागले? कारण चिंचोळ्या जागेतील भीषण कडेलोटाची उतरण ! सर्व शस्त्रे, सामान जनावरे घेऊन परतणे अशक्य होते...






# वेगळ्या नकाशातील अँगलमधून भीषणतेची कल्पना येते...






# घळीतील अती अरुंद व उभ्या उतरणीने 650 मीटर वरून 90 मीटरवर छावणीच्या सखल प्रदेशात प्रवेश







सैनिक उतरून जाताना लाल रंगाने व परत चढून येताना निळ्या रंगाने मुद्दाम वाट वेगळी दाखवली आहे.
जनावरांना चढायला अत्यंत खतरनाक मोड
बोजड आणि आडमाप वजन पाठीवर घेऊन जनावरांना उतरायला अत्यंत धोक्याचा घसरडा उतार
Google

# चिंचोळ्या व बिकट घाटातून उतरताना अपघातांनी व पसरलेली भीषण अस्वस्थता

- मागे वळून पाहता पाहता उंचच्या उंच पहाडांच्या टोकांचा, चिचोळ्या व एका बाजूला खोल दरी व एका बाजूला खडा पहाड, गर्द झाडी, यांचा आवाका घेत, ‘चुकुनही याच वाटेने परत जायची वेळ येऊ नये’ असे म्हणत सैन्याला चावनी किंवा छावनी या सखल भागात दुपारपर्यंत कसेबसे येता आले…
- खान व बडे सरदार आपापल्या बायका-पोरांच्या भल्या मोठ्या लवाजम्यासह आपापल्या सैन्याची मोजदाद व भोजनाची व्यवस्था लावून हाश्य हुश्य करत होते.
- टेहळणी तुकडीकडून पुढील मार्गातील कष्टमय भागांची, जनावरांना पिण्याच्या पाण्याची सोय पाहात होते. यापुढे आता आणखी कुठे खाली उतरायला लागणार का, आपले सर्व रणसामान रचून लढाईच्या तयारीसाठी लागणारी शस्त्रे उघडून घासून पुसून तयार करायला जवळचा किल्ला कुठे आहे? यावर सैनिकांत आपापसात चर्चा रंगली लागली होती.
- सिवा एकाएकी येतो आणि लढाईला तयारीला वेळ न देता आणि अचानक ‘हरहर महादेव’ म्हणत त्यांचे सैन्य दगड, बाण, बंदुकीचे बार यातून मुगलखानांच्या बेसावध सैन्यावर तुटून पडतात असे ते ऐकून होते… या वेळीही असे काही होईल कि काय अशी मनात धाकधूक वाटत होती…

# शिवाजी महाराजांच्या सैन्य हालचाली




- महाराज कुठे होते यावरून त्यांच्या सैन्य हालचाली नक्की करता येतात.
- शाहिस्तेखान कोकणात फौज पाठवून कल्याण – भिवंडी ते खाली सुधागड पर्यंतचे गड काबीज करायला निघेल असा अंदाज करून महाराज पाली-पेणच्या आसपास असावेत.
- ती बातमी कळल्याने शाहिस्तेखानाने करतलबखानाला तातडीने कोकणातच शिवाजीचा बंदोबस्त करायला पाठवले असावे.
- वरील नकाशा मात्र महाराजांना राजगडावरून जायचे असेल तर मार्ग दर्शवतो.

# लढाईच्या तयारीतील संदेशवाहकांची मांडामांड सुरुवात

- महाराजांच्या या मोहिमेतील सैन्यामधे सुरुवातीला जाणाऱ्या घोडेस्वारांत वाद्ये वाजवणारे घोषक आणि ध्वज रंग आणि आकार यातून हातांचे संचलन करून दर्शक पथकात कमीत कमी २५ - ३० घोडेस्वार असावेत.
- त्यांनी शंख, शिंग, तुतारी, शिट्ट्या, ढोल, या वेगवेगळ्या आवाजांच्या कृतीतून महाराजांचे संदेश दूरवर पसरलेल्या सैन्याला आदेश करण्यासाठी त्या साधनांचा कसा त्याचा उपयोग केला होता याचा प्रत्यय येतो.



# शिवाजी महाराजांच्या सैन्याची जमवाजमव

- सध्याच्या काळातील हुद्दे महाराजांचे सरदारांना दिले तर ते ब्रिगेडियर नेतोजी पालकर, लेफ्टनंट कमांडर्स तानाजी मालुसरे, येसाजी कंक असे असावेत. त्यांचे मावळे सैन्य दोन हजारपेक्षा जास्त उपस्थित असावे. याशिवाय अन्य मोहिमेवर गेलेल्या काही सरदारांना बोलावणे पाठवून त्यांची शिल्लकी फौज म्हणून महाराजांच्या मागे उंबर टेकडीवर लपून उभी केली असावी. महाराज तीनही टेकड्यामधील सखल भागातील घडणाऱ्या सैन्य हालचालींवर बारीक लक्ष ठेवून असावेत.
- हे सर्व सैन्य सावधपणे सकाळी आठ वाजेपर्यंत आपापल्या जागी पोहोचणे असा आदेश सरसेनापतीकडून मिळाला असावा.
- हल्ला करून गडाच्या आत शिरायला दरवाजे किंवा जाड लाकडी अडथळे पार करण्यासाठी कुऱ्हाडी, पहारी, लांब दांड्यांचे हातोडे, घण, छिन्न्या यांचे तोडफोड पथक नेहमीच बरोबर असावे. महाराजांची स्वतःची सुरक्षा पथके, घोषवादक, सल्लागार वकील-हेजीब, अशी पथके महाराजांच्या बरोबर नेहमीच्या मोहिमेत असत. या मोहिमेतील महत्वाच्या सरदारानी नंतर खान सोडून गेलेली जनावरे, हत्यारे मिळवली. खजिना सरकारात जमा केला.


मृगगड किल्ला
Mangaon
कुरवंडे घाट मार्ग
करतलबखानाचा तळ
Ghotawade
घोटवडे
Chavani
चावनी
तानाजींची कंपनी
नेतोजींची कंपनी
येसाजी कंक यांची कंपनी
निरोप आणि ध्वज, घोषवाद्यांचे पथक
धूर करणारे प्लाटून
तुक्साई
शिवाजी महाराज येथील टेकडीवरून नदी पात्राच्या दोन्ही बाजूचे निरीक्षण करताना
2D

# येसाजी कंक आणि तानाजी मालुसरे यांची प्लाटून्स

- पांढरा धूराचा लोळ झाला आणि रणवाद्ये वाजली की आघाडीच्या सैन्याने गोफणीतून गोटेफेक करत शत्रूची शिस्त मोडून पळापळ करायला लावायचे व गोंधळ माजवायचा. त्या मागील प्लाटून कमांडरच्या  मेजर हुद्द्याच्या सरदारांनी बाणांच्या तुकडीकडून जनावरांवर वेध घेऊन त्यांना बिथरवून टाकायला हल्ला करणे.
- यातून वाचलेले, सावरलेले शत्रू सैन्य आपल्यावर हल्ला करायला येतील, त्यांना तलवारींनी ठार मारायला एकएक तुकड्या (स्वाड्र)झाडीत लपून तयार होत्या. येसाजी कंक, तानाजी मालुसरे यासारखे लेफ्टनंट कर्नलच्या हुद्द्याचे सरदार आपापले सैन्य गारमाळेच्या चढावर लपून होते. ते ही दगडगोटे, बाण आणि तलवारींनी हल्ल्याच्या तयारीने एका मागे एक प्लाटून रचून दडलेले होते.
- दोन्ही कमांडरांच्या जवळ रणवाद्यांचे पथक आणि ध्वजसंचलनाचे पथक महाराजांकडील सांकेतिक आदेश समजून घेऊन त्यानुसार सरदारांना वेळोवेळी सावध करून देत होते.

# लढाईची अंबा नदीपाशी सुरुवात

- करतलबखानाच्या छावणीत… नदी पात्राकडील भागात चुलाणे पेटवून बनवलेल्या भोजनाला सैन्यात वाटून देण्याच्या लगबगीत भटारखान्यातील लोक होते. शिपाई आपापल्या जनावरांच्या शरीराची तपासणी करून कोणाला कुठे व किती दुखापत झाली याची विचारपूस करत होते.
- तिकडे महाराजांच्या आघाडीच्या पलटणींवर धूर निर्माण करून शत्रूच्या आघाडीच्या सैनिक तुकड्यांना मागे सरकवून पळापळी परिस्थिती निर्माण करण्यासाठी शेणकुटे पेटवली गेली.
- मागे गेलेल्या मुगलांच्या उलटून परत येणाऱ्या सैन्यावर बाणांचा वर्षाव करणारे आणि दगडमार, धनुष्य बाण व लगोऱ्यावाले प्लाटून सरसाउन बसले.
- पांढरा धूर झालेला पाहून आसपासच्या टेकड्यांवर उभ्या केलेल्या घोषपथकाने मोठ्या प्रमाणात रणवाद्यांचे भेसूरस्वर मोठ्याने वाजायला सुरवात झाली.
- यामधून सैन्याच्या दोन्ही डोंगराच्या चढावर येण्याचा जे प्रयत्न करतील, तेव्हा त्यांना टिपून मारून जखमी करणे आणि परतवून लावणे. हे ठरवल्या प्रमाणे सुरू झाल्यावर…

# अचानक हल्ला व गोंधळ

- करतलबखान आणि भोजनोत्तर विश्राम घेत असलेले देशाच्या वेगवेगळ्या भागातून या मोहिमेसाठी निवडल गेलेले त्याचे सरदार, जे एकमेकांना अजून नीट ओळखत देखील नव्हते. ते अचानक निर्माण झालेल्या आणिबाणीच्या परिस्थितीने भांबावून गेले होते.
- धामधुमीतला गोंधळाचा आवाज आणि महाराजांच्या घोषवाद्यांनी निर्माण झालेले रणशिंगांचे आवाज यातून काहीतरी गडबड उडालेली असावी असे लक्षात येऊन हाताखालील महत्त्वाच्या सरदारांना काय परिस्थिती आहे हे पाहण्यास करतलबखानाने ताबडतोब पाठवले.
- आपल्या सैन्याची गाळण उडालेली स्थिती पाहून त्यांनी भयभीत सेनेला धीर देऊन शिवाजीच्या सैनिकांवर उलटून हल्ला करण्याचा आदेश दिला. त्या आदेशाचा प्रभाव पडून सैनिकांनी आपापली शस्त्रे परजून झाडीत लपलेल्यांना शोधून मारायला सुरवात केली.
- बाणांनी टिपून अचुक वेध घेणारे मुगल तिरंदाज आपल्या युद्ध कौशल्याने एका एका मावळ्यांना घायाळ करून परतवत होते. कमी संख्येच्या शिवाजीं महाराजांच्या सैन्याला त्यांचा हल्ला परतवायला कमी पडायला लागू लागले.

# शिवाजी महाराजांची तिन्ही बाजूंनी पूर्ण बंदिस्त करायची सैन्य रचना



# आगामी चकमकींची चाचपणी

- पुन्हा एकदा मोठा जाळ करून धूराच्या शेण्या फेकून दूरवर लपायला मावळे वेळ मिळवू लागले. वाऱ्याचा रोख बदलता असल्याने कधी कधी त्यांच्यावर धुराचा प्रभाव पडून कुठे लपावे याचा संभ्रम होत होता.
- आत्ता पर्यंत शांत असलेली नदीच्या दुसऱ्या काठाच्या बाजूची उंच टेकडी अचानक मावळ्यांच्या 'हरहर महादेव' रणगर्जनेने दणाणून गेली.
- सरदारांच्या कडून परिस्थितीची विचारणा करताना खानाच्या लक्षात आले की आपल्यावर शिवाजीच्या सैनिकांचा हल्ला झालेला आहे. त्या अर्थी 'सिवा' आसपास असायला हवा. तसा तो असेल तर अनायसे आपल्याला सामोरा आला आहे. भरपूर सैन्य बळ आपल्याकडे आहे.

# करतलबखानाच्या सरदारांचे सेनेला प्रोत्साहन

- सुरवातीला जरी आपल्या सैनिकांना शिवाच्या सैन्याने घेरले गेले तरी काही वेळात कमी संख्येच्या सेनेला आपले मोठे संख्याबळ आवरू शकणार नाही. ते एकतर पळून जातील किंवा लढून मरून जातील.
- सैन्याचे मनोबल वाढवण्यासाठी तो स्वतःतंबूच्या बाहेर पडून कर्ण्यावरून ओरडून ओरडून परत फिरून मावळ्यांचा खातमा करायची चिथावणी देत राहिला. जखमी सैनिकांना परतलेले पाहून त्यांना उद्देशून ओरडत राहिला की तुम्ही धुराला काय घाबरता? मागे फिरा आणि त्यांचा मुकाबला करा.
- त्याप्रमाणे सेनेतील कनिष्ठ सरदार आपापल्या सैन्याच्या तुकड्यांना ओरडून ओरडून पुन्हा नदीच्या पात्राच्या दोन्ही बाजूला झुडुपात आणि झाडावर लपलेल्या शिवाजी महाराजांच्या सैन्यावर हल्ला करण्यासाठी उत्साहित करण्याने मुघल सैन्य त्वेषाने लढू लागले. साधारण तासभराच्या या धामधुमीचा काल होता.

# अंबेनळी आणि महाराज उभे असलेली उंबरे टेकडी






# शिवाजी महाराजांच्या डोळ्यांसमोर आणि उजव्या बाजूचा अंबा नदीचा परिसर दिसावा अशी उंबर टेकडीची उंच जागा निवडली.







# उंबरखिंडीतील नाट्य



समरभुमी उंबरखिंडीचा
इतिहास
छावणी, ता. खालापुर, जि. रायगड

२ फेब्रुवारी १६६१ रोजी छत्रपती शिवाजी महाराजांनी कारतलब खान, स्त्री सरदार रायबागन व तीस हजार फौजेचा उंबरखिंड या ठिकाणी पराभव केला.
खान कोकण काबीज करण्यासाठी आंबेनाळ उंबरखिंड मार्गे उतरणार हे महाराजांना समजताच त्यांनी स्वराज्याचे सरसेनापती नेताजी पालकरांना पुढे जाऊन छावणी टाकण्यास सांगीतले. स्वराज्याचे सैन्य उंबरखिंडींच्या मार्गात दबा धरून बसले होते. खानाचे सैन्य उंबरखिंडीत उतरते ना उतरते तोच छत्रपती शिवाजी महाराजांनी खानाच्या सैन्यावर हल्ला चढवीला. एका बाजुने नेताजी पालकर दुसऱ्या बाजुने स्वतः शिवाजी महाराज असे कोंडीत पकडून, अचानक झालेल्या हल्ल्यामुळे खानाच्या सैन्याची दाणादाण उडाली. खानास माघार घ्यावी लागली. या लढाईची वैशिष्टये अशी की, कमी सैन्याने प्रचंड शत्रुचा गनिमीकाव्याने पराभव केला.

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वतः एकूण २७ महत्वपुर्ण लढायामध्ये भाग घेतला होता त्यापैकी ही एक लढाई आहे.

**करतलबखानाची अंबे नळीतील शरणागती - आगामी भाग 2 पुढे चालू.**